**जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती च्या कार्यकारी परिषदेतील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.डीएमएफ-१२१६/प्र.क्र.११०/उद्योग-९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २४ एप्रिल, २०१७.

**पहा-** १. शासन अधिसुचना क्र. एमडीएफ ६१५/५१/प्र. क्र. ३४/ उद्योग-९, दिनांक ०१.०९.२०१६. (महाराष्ट्र शासन राजपत्र, प्रकाशित दिनांक ०७.०९.२०१६.)
२. शासन अधिसुचना क्र. एमडीएफ ०६१५/प्र. क्र. ३४/ उद्योग-९, दिनांक ०१.०९.२०१६. (महाराष्ट्र शासन राजपत्र, प्रकाशित दिनांक ०७.०९.२०१६.)

**प्रस्तावना-**

खाण मंत्रालय, भारत सरकार यांनी खाण व खनिजे (विकसन व विनियमन) अधिनियम, १९५७ मध्ये सुधारणा करून खाण व खनिजे (विकसन व विनियमन) सुधारणा अधिनियम, २०१५ हा शासन अधिसुचना, दिनांक २७.०३.२०१५ अन्वये अधिसूचित केला आहे.

२. प्रस्तुत खाण व खनिजे (विकसन व विनियमन) सुधारणा अधिनियम, २०१५ मधील कलम ९ (B) मधील तरतुदींनुसार राज्यातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये खाणबाधित क्षेत्र व व्यक्तींच्या विकासाकरिता जिल्हा खनिज प्रतिष्ठान स्थापन करणे अपेक्षित आहे. सदरील तरतुदींच्या अनुषंगाने दिनांक ०१.०९.२०१६ च्या शासन अधिसुचनेअन्वये जिल्हा खनिज प्रतिष्ठानची स्थापना, रचना व कार्यपध्दतीबाबतचे नियम निर्गमित करण्यात आले आहेत.

३. सदर नियमातील तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती च्या कार्यकारी परिषदेमधील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तीकरिता अमरावती जिल्ह्याचे पालक मंत्री तथा अध्यक्ष जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती यांच्याकडून शिफारस प्राप्त झाली आहे. सदर शिफारशींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती यांच्या कार्यकारी परिषदेवरील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता शासन अधिसुचना दिनांक ०१.०९.२०१६ च्या तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती च्या कार्यकारी परिषदेवर (Governing Council) पुढील सदस्यांची नामनिर्देशित सदस्य म्हणून नियुक्ती करण्यास सहमती देण्यात येत आहे.

**प्रतिष्ठानचे नाव- जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.**

| **अ. क्र.** | **सदस्य** | **पदनाम** | **नामनिर्देशन / शिफारस** |
|---|---|---|---|
| ०१ | जिल्ह्यातील विधानसभा / विधानपरिषद सदस्यांमधून कमाल ०३ सदस्य | सदस्य | ०१.मा. डॉ. सुनिल पंजाबराव देशमुख, विधानसभा सदस्य<br>०२.मा. श्री. रमेश गणपतराव बुंदिले, विधानसभा सदस्य<br>०३. मा. श्री. श्रीकांत गोविंद देशपांडे, विधानपरिषद सदस्य |
| ०२ | जिल्ह्यातील सेवाभावी संस्थांमध्ये कार्यरत व्यक्तींमधून कमाल ०२ सदस्य | सदस्य | ०१. श्री. प्रणय कुलकर्णी.<br>०२. श्री. अजय सामदेकर. |
| ०३ | जिल्हा खनिज प्रतिष्ठानास अंशदान देणारे संबंधित जिल्ह्यातील खाणपट्टाधारकाचे प्रतिनिधी कमाल ०३ सदस्य | सदस्य | ०१.श्री. अशोक बसेरिया.<br>०२.श्री.अरुण पडोळे.<br>०३.श्री. अशोक केडिया. |

५. उपरोक्त नमूद सदस्यांच्या कार्यकाळाबाबत दिनांक ०१.०९.२०१६ च्या शासन अधिसुचनेतील सर्व तरतुदी लागू राहतील. उपरोक्त नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती पुढील ०३ वर्षांकरिता अथवा ते सदर पदावर कार्यरत असतील या पैकी जे अगोदर असेल त्या कालावधीकरिता या शासन निर्णयाच्या दिनांकापासून करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०४२११५३८५५१९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Suresh Lalji Bhoi

Digitally signed by Suresh Lalji Bhoi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d55c1e539b496c2ceae3f06297cb3216d28e45dd596c5cd3493ae8b0b33e22a, serialNumber=37c41caf469e4ce47634f33d7e6317dfa36291fb36f7b640d31fe19f7a338b98, cn=Suresh Lalji Bhoi
Date: 2017.04.24 16:23:27 +05'30'

**(सु. ला. भोई)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. पालक मंत्री तथा अध्यक्ष जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती यांचे स्वीय सहायक.
४) मा. राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा खनिज प्रतिष्ठान, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती.
६) मा. डॉ. सुनिल पंजाबराव देशमुख, विधानसभा सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
७) मा. श्री. रमेश गणपतराव बुंदिले, विधानसभा सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
८) मा. श्री. श्रीकांत गोविंद देशपांडे, विधानपरिषद सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
९) श्री. प्रणय कुलकर्णी, तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
१०) श्री. अजय सामदेकर, तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
११) श्री. अशोक बसेरिया, तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
१२) श्री.अरुण पडोळे, तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
१३) श्री. अशोक केडिया, तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती.
१४) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
१६) प्रधान सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग. मंत्रालय, मुंबई ३२.
१७) उपसचिव (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१८) जिल्हा खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती.

यांना विनंती करण्यांत येते की त्यांनी जिल्हा खनिज प्रतिष्ठान, अमरावती च्या कार्यकारी परिषदेतील (Governing Council) उपरोक्त नामनिर्देशित सदस्यांना सदरील नामनिर्देशनाबाबत आपले स्तरावरून अवगत करावे.

१९) निवड नस्ती (उद्योग-९)